उद्योग संचालनालय व अधिपत्याखालील कार्यालयातील सरळसेवेने, पदोन्नतीने वा प्रतिनियुक्तीने करावयाच्या नेमणूका/ पदस्थापनेच्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेण्यासाठी नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. नियुक्ती २०२४/२५६/प्र.क्र.७२/उद्योग-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १० मे, २०२४

**संदर्भ :**

१. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२९०/कार्या-१२, दि.१९.११.२०१६

२. उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उसं/आस्थापना/नियुक्ती अधिकारी घोषित करणे/२०२४/अे-३७३, दि.३१.०३.२०२४

**प्रस्तावना :**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या संदर्भात त्यांच्या सरळसेवेने, पदोन्नतीने वा प्रतिनियुक्तीने करावयाच्या नेमणूका/ पदस्थापनेच्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेण्यासाठी नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याबाबत संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत. त्यानुषंगाने संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये विनंती करण्यात आल्यानुसार उद्योग संचालनालय व अधिपत्याखालील कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड मधील पदांवर सरळसेवेने, पदोन्नतीने वा प्रतिनियुक्तीने करावयाच्या नेमणूका/ पदस्थापनेच्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेण्यासाठी नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उद्योग संचालनालय व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड मधील पदांवर सरळसेवेने, पदोन्नतीने वा प्रतिनियुक्तीने करावयाच्या नेमणूका/ पदस्थापनेच्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पदे | नियुक्ती प्राधिकारी |
|---|---|---|
| १ | मुख्यालय तसेच मैत्री कक्षातील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड संवर्गातील पदे तसेच **राज्यस्तरीय उद्योग निरीक्षक, गट-क संवर्गातील पदे** | विकास आयुक्त (उद्योग) |
| २ | विभागीय कार्यालये व जिल्हा उद्योग केंद्रांमधील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड संवर्गातील पदे **(राज्यस्तरीय उद्योग निरीक्षक, गट-क संवर्गातील पदे वगळून)** | उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय |

३. यानुषंगाने संदर्भ क्र.१ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या सर्व सूचना लागू राहतील. तसेच वरील नियुक्ती अधिकारी हे सरळसेवेने, पदोन्नतीने, प्रतिनियुक्तीने करावयाच्या नेमणूका/पदस्थापनेच्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेण्यासाठी सक्षम असतील. मात्र, संबंधित कर्मचाऱ्यांच्या बदली करण्यासंदर्भात "महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५" च्या तरतुदीनुसार घोषित केलेले तसेच तद्नुषंगाने वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या परिपत्रक/ आदेश/ शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आलेले सक्षम प्राधिकारी अंतिम निर्णय घेतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५१०१२०६३४३०१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHANK
TUKARAM
CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2024.05.10 12:20:26 +05'30'

**( शशांक चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नविन प्रशासकीय भवन, मुंबई.
७. अतिरिक्त विकास आयुक्त, उद्योग संचालनालय, नविन प्रशासकीय भवन, मुंबई.
८. सर्व उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालय
९. निवडनस्ती.